**राज्यातील पिक कर्जाच्या परतफेडीस**
**मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
शासन निर्णय क्रमाक: सीसीआर १४१३/प्र.क्र.४०४/२-स
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.,**
दिनांक: ०१ ऑगष्ट, २०१४

**पहा:** १) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सीसीआर १४९९/प्र.क्र.१३५/२-स, दि. २६.४.१९९९
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सीसीआर १४१०/प्र.क्र.१०३०/२-स, दि. १९.१०.२०१२
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सीसीआर ०६१२/प्र.क्र.२६९/२-स, दि.३.१२.२०१२

**प्रस्तावना :-**

राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व व्यापारी बँकामार्फत शेतकऱ्यांना पिक कर्ज पुरवठा करण्यात येतो. राज्यातील जे शेतकरी खरीप व रब्बी पिक कर्जाची परतफेड दि. ३० जून पर्यंत करतात अशा शेतकऱ्यांना पिक कर्जाच्या व्याजामध्ये प्रोत्साहनपर सवलत देण्यासाठी शासनामार्फत डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना राबविण्यात येत आहे. या योजनेमुळे राज्यातील बहुतांश शेतकरी त्यांच्या पिक कर्जाची परतफेड विहित मुदतीत करतात. त्यामुळे बँकाची पिक कर्जाची अपेक्षित वसुली होण्यास मदत होते.

राज्यातील जे शेतकरी पीक कर्जाची विहीत मुदतीत परतफेड करतात अशा शेतक-यांना राज्य शासनाच्या डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत ३% व्याजाची रक्कम शासनामार्फत बॅकांना अदा करण्यात येते. राज्यातील गारपीठग्रस्त शेतक-यांना पीक कर्जाच्या वसुलीस दि. ३१.१२.२०१४ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आली आहे. या पार्श्वभुमीवर दि. ३०.६.२०१४ अखेर राज्यातील पीक कर्जाच्या वसुलीचे कमी प्रमाण विचारात घेऊन जास्तीत जास्त शेतक-यांना डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेचा लाभ मिळण्याच्या दृष्टीने सन २०१३-१४ या वर्षात वाटप केलेल्या पीक कर्जाच्या परतफेडीस दि. ३१.८.२०१४ पर्यन्त मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वरील प्रस्तावनेत नमूद केलेली परिस्थिती विचारात घेता राज्यातील शेतकऱ्यांना पिक कर्जाच्या परतफेडीसाठी चालू आर्थिक वर्षापुरती दि.३० जून २०१४ ऐवजी ३१ ऑगस्ट २०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यास या निर्णयान्वये शासनाची मंजुरी देण्यात येत आहे. या मुदतीत पिक कर्जाची परतफेड करणारे राज्यातील सर्व शेतकरी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेचा लाभ मिळण्यास पात्र ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१४०८०२१६०००६९४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Arun Patil
Date: 2014.08.02 17:10:14 +05'30'

**(संतोष पाटील)**
**विशेष कार्य अधिकारी , महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. अपर मुख्य सचिव,मा. मुख्यमंत्री यांचे कार्यालय,मंत्रालय,मुंबई
२. मा . मंत्री /मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
३. मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
४. सहकार आयुक्त व निबंधक ,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे
५. सहसचिव,भारत सरकार,कृषि मंत्रालय (सहकार विभाग) कृषि भवन,नवी दिल्ली
६. मुख्य अधिकारी, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, ॲग्रीकल्चर क्रेडिट डिपार्टमेंट,गारमेट हाऊस,मुंबई
७. विभागीय आयुक्त (सर्व)
८. जिल्हाधिकारी (सर्व)
९. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था(सर्व)
१०.जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था(सर्व)
११.जिल्हा कोषागार अधिकारी(सर्व)
१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक,मर्या.,मुंबई

१३.सरव्यवस्थापक/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक(सर्व)
१४.लीड बँक, (सर्व)
१५.राज्यस्तरीय बँकर्स समिती (सहकार आयुक्त व निबंधक ,सहकारी संस्था,यांच्या मार्फत)
१६.नाबार्डचे संबंधित अधिकारी (सहकार आयुक्त व निबंधक ,सहकारी संस्था,यांच्या मार्फत)
१७.सर्व ग्रामीण बँका (सहकार आयुक्त व निबंधक ,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या मार्फत)
१८. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ३ प्रती)
१९.महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ३ प्रती)
२०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई
२१.सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर ,मुंबई
२२.नियोजन विभाग (१४११,१४३१ व १४६३) मंत्रालय,मुंबई
२३.वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३),मंत्रालय,मुंबई ३२
२४.कक्ष अधिकारी (१६-स/ १७-स ) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
२५.निवडनस्ती ( २-स)